अपारंपारिक ऊर्जा निर्मितीस गती देण्यासाठी
धोरण निश्चित करणे.

महाराष्ट्र शासन
उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग,
शासन निर्णय क्रमांक : सौरप्र- २०२०/प्र.क्र.१३६/ऊर्जा-७
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
दि. २४ जुलै, २०२०.

प्रस्तावना :

केंद्र शासनाच्या अपारंपारिक ऊर्जा निर्मितीस यामध्ये प्रामुख्याने सौर ऊर्जा निर्मितीस प्राधान्य देण्याचे धोरण असून त्यासाठी आवश्यक त्या उपाययोजना करण्याचे निर्देश आहेत. त्याअनुषंगाने अपारंपारिक ऊर्जा निर्मितीस यामध्ये प्रामुख्याने सौर ऊर्जा निर्मितीसाठी राज्य शासनामार्फत अनेक उपाययोजना राबविण्यात येत आहेत. त्यांची प्रभावीपणे अंमलबजावणी करण्यासाठी आवश्यक असणाऱ्या जमिनी उपलब्ध करुन घेण्यामध्ये अडचणी निर्माण होत आहेत. यासाठी एक खिडकी योजना राबविणे, शासकीय जमिनी उपलब्धतेसाठी लँड बँक तयार करणे व त्या करिता नवीन कंपनी कर्नाटक व राजस्थानच्या धर्तीवर तयार करणे, तसेच सौर ऊर्जा निर्मितीमध्ये इतर राज्यांमध्ये करण्यात येत असलेली अंमलबजावणी याचा अभ्यास करुन उपाययोजना सुचविणे इ. बाबत धोरण निश्चित करण्यासाठी प्रधान सचिव (ऊर्जा) यांच्या अध्यक्षतेखाली सदस्य असलेली समिती स्थापन करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्याअनुषंगाने राज्य शासनाने खालील प्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय :**

राज्यातील अपारंपारिक ऊर्जा निर्मितीस प्राधान्य देऊन राज्याचे सर्वसमावेशक अपारंपारिक ऊर्जा निर्मितीचे धोरण तयार करुन शासनास शिफारशी करण्याकरिता प्रधान सचिव (ऊर्जा) यांच्या अध्यक्षतेखाली खालील प्रमाणे उच्चस्तरीय समिती गठीत करण्यात येत आहे.

| अ.क्र. | सदस्याचे नांव | | पद |
|---|---|---|---|
| १ | प्रधान सचिव (ऊर्जा) | : | अध्यक्ष |
| २ | अध्यक्ष व व्यवस्थापकीय संचालक, महावितरण | : | सदस्य |
| ३ | अध्यक्ष व व्यवस्थापकीय संचालक, महानिर्मिती | : | सदस्य |
| ४ | अध्यक्ष व व्यवस्थापकीय संचालक, महापारेषण | : | सदस्य |
| ५ | महासंचालक, महाऊर्जा, पुणे. | : | सदस्य |
| ६ | सह सचिव/उप सचिव, ऊर्जा विभाग | : | सदस्य सचिव |

२. उक्त समितीची कार्यकक्षा खालील प्रमाणे राहील :-

(१) समितीने शेजारील राज्यांतील उदा. कर्नाटक, गुजरात, आंध्रप्रदेश इ. मधील सौर निर्मिती प्रकल्प व इतर प्रकल्पांचा अभ्यास करुन त्यासाठी आवश्यक असलेल्या उपाययोजना सुचविणे.

(२) सौर प्रकल्पांच्या मंजूरीसाठी एक खिडकी योजना राबविणे तसेच लँड बँक तयार करण्यासाठी कंपनीची कर्नाटक व राजस्थानच्या धर्तीवर स्थापना करणे व उक्त कंपनीची संरचना, कार्यप्रणाली इ. बाबत उपाययोजना सुचविणे.

(३) अपारंपारिक ऊर्जा प्रकल्पांसाठीच्या मंजूरीसाठी एक खिडकी योजनेसाठीची कार्यपद्धती निश्चित करणे.

(४) याशिवाय शासनातर्फे देण्यात येणाऱ्या विविध मुद्यांचा समावेश करण्यात यावा.

३. समितीने वरील बाबींचा अभ्यास करुन समितीचा अहवाल १५ दिवसांत शासनास सादर करावा.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.inया संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक क्र. २०२००७२७११४४५५९४१० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Prashant Pundlik Badgeri

Digitally signed by Prashant Pundlik Badgeri
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Industry Energy and Labour Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=07ae22a8e7fa4047ce6ff816d85e77eec14db9926b325a140acf9b28bb990786, serialNumber=ec955e2d360e1fddb6abac58a907419053beeceb5dbac48a78c89c588ff71bef, cn=Prashant Pundlik Badgeri
Date: 2020.07.27 11:53:59 +05'30'

**(प्र.पुं.बडगेरी)**
**उप सचिव**

**प्रति,**

१. मा.राज्यपालांचे सचिव,
२. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,
३. मा.उपमुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,
४. मा.मंत्री व राज्यमंत्री यांचे प्रधान सचिव,
५. मुख्य सचिवांचे स्वीय सहायक,
६. प्रधान सचिव (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई,
७. प्रधान सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई,
८. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई ४०० ०२०,
९. महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई ४०० ०२०,
१०. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-२, नागपूर,
११. महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र-२, नागपूर,
१२. अधिदान व लेखा अधिकरी, वांद्रे (पूर्व), मुंबई ४०० ०५१,
१३. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
१४. निवासी लेखा अधिकारी, मुंबई.
१५. संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई,
१६. अध्यक्ष व व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य विद्युत मंडळ, सुत्रधार कंपनी मर्यादित, मुंबई,
१७. अध्यक्ष व व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य विद्युत निर्मिती कंपनी मर्यादित, मुंबई,
१८. अध्यक्ष व व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनी मर्यादित, मुंबई,
१९. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य विद्युत पारेषण कंपनी मर्यादित, मुंबई,
२०. महासंचालक, महाऊर्जा, पुणे,
२१. ऊर्जा विभागातील सर्व कार्यासने, मंत्रालय, मुंबई,
२२. निवड नस्ती (ऊर्जा-१).